**उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई या पदावर करार पध्दतीने केलेल्या नेमणूकीस मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांक : संकीर्ण-१०१८/प्र.क्र. ३६/सेवा-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८ मे, २०२०

वाचा :-१. सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र. खाक्षेस-१०९६/प्र.क्र.८०/रस्ते-८, दिनांक ०९/०७/१९९६,
२. सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र. खाक्षेस-१०९६/८०/रस्ते-८, दिनांक २१/०४/१९९९,
३. सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र. खाक्षेस-१०९६/८०(१)/रस्ते-८, दिनांक ०९/०२/२०००,
४. सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२७१५/प्र.क्र.१००/१३, दिनांक १७/१२/२०१६,
५. सामान्य प्रशासन विभाग शासन शुध्दीपत्रक क्र.संकीर्ण-२७१५/प्र.क्र.१००/१३, दिनांक २१/०२/२०१८.
६. शासनाचे समक्रमांकाचे दि. २८ फेब्रुवारी, २०१८, दि. २८ फेब्रुवारी, २०१९ व दि. २८ फेब्रुवारी, २०२० रोजीचे आदेश.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाची स्थापना जुलै, १९९६ मध्ये करण्यात आली आहे व दिनांक २९/११/१९९६ च्या शासन निर्णयान्वये महामंडळाची उद्दिष्टे, रचना व उत्पन्नाची प्रमुख साधने या बाबत पुनर्विचार करण्यात आला. त्यानुसार महामंडळाच्या संचालक मंडळाच्या रचनेत सुधारणा करण्यात आली. त्यानंतर संदर्भ क्र. २ व ३ नुसार अनुक्रमे दि. २१/०४/१९९९ व दि. ०९/०२/२००० च्या शासन निर्णयान्वये महामंडळाच्या संचालक मंडळाची पुनर्रचना करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयानुसार शासन सेवेतील किंवा सेवानिवृत्त सचिव किंवा त्याहून वरिष्ठ दर्जाचे अधिकारी यांची महामंडळाचे उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक या पदावर नियुक्ती करण्याची तरतूद आहे.

२. प्रथमत: शासन आदेश समक्रमांक दि. २८ फेब्रुवारी, २०१८ अन्वये उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक या पदावर श्री. राधेश्याम मोपलवार (भाप्रसे) (सेवानिवृत्त) यांची एक वर्षाच्या कालावधीकरिता करार पध्दतीने नियुक्ती करण्यास शासन मान्यता देण्यात आली होती. त्यानंतर शासन आदेश समक्रमांक दि. २८ फेब्रुवारी, २०१९ अन्वये सदर करार पध्दतीने नियुक्तीस एक वर्षासाठी व शासन आदेश दि. २८ फेब्रुवारी, २०२० अन्वये सदर करार पध्दतीने नियुक्तीस तीन महिन्यासाठी मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देण्यात आली होती.

३. महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळामार्फत हिंदुह्रदय सम्राट बाळासाहेब ठाकरे महाराष्ट्र समृद्धी महामार्ग, वर्सोवा-ब्रांदा सी लिंक प्रकल्प, मुंबई-पुणे द्रुतगती महामार्गावरील मिसींग लिंक प्रकल्प असे महत्त्वाकांक्षी प्रकल्प राबविले जात आहेत. सदर प्रकल्पांची व्याप्ती मोठी असून, त्यांच्या प्रत्यक्ष बांधकामास सुरुवात झालेली आहे. या प्रकल्पांच्या क्लिष्ट बाबींचे सुयोग्य नियोजन करुन त्या मार्गी लावण्याचे व प्रकल्पांसाठी विविध वित्तीय संस्थांच्या मदतीने निधी उभारणी करण्याचे काम तसेच सदर प्रकल्प नियोजित वेळेत पूर्ण करण्याची बाब विचारात घेवून श्री. राधेश्याम मोपलवार यांच्या करार पध्दतीच्या नियुक्तीस दि. १ जून, २०२० पासून पुढील **एक वर्षाच्या (दि. ३१ मे, २०२१ पर्यंत) कालावधीकरिता मुदतवाढ** देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

४. श्री. राधेश्याम मोपलवार यांच्या करार पध्दतीने नियुक्तीच्या अनुषंगाने अटी व शर्ती, त्यांना देय असलेले वेतन व भत्ते (मासिक पारिश्रमिक) तसेच त्यांचे प्रशासकीय व वित्तीय अधिकार निश्चित करणे या बाबतची कार्यवाही सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२७१५/प्र.क्र.१००/१३, दि. १७/१२/२०१६ व शासन शुध्दीपत्रक दि. २१/०२/२०१८ मधील तरतूदीनुसार करण्यात येईल. तसेच शासन आदेश क्र. संकीर्ण १९१८/प्र.क्र.१३०/प्रशा-२, दि. १ ऑगस्ट, २०१८ अन्वये विहित केलेल्या अटी-शर्ती कायम राहतील.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००५२८१५१४२३७५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT ARVIND SAGANE

Digitally signed by AJIT ARVIND SAGANE
DN: c=IN, o=Personal, cn=AJIT ARVIND SAGANE, serialNumber=a224c1f9862a45ad945dc765fff30c9c74e9fb4b8cb5ede7be8f6056ccb1a290, postalCode=440025, 2.5.4.20=c57767076e5e3f9622fccc6661ef87d8903721bd5ca71115026423aaa299da3e, st=Maharashtra
Date: 2020.05.28 15:26:45 +05'30'

**(अ. अ. सगणे)**
**सचिव (बांधकामे), महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम विभाग (सार्वजनिक उपक्रम वगळून), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम विभाग (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा. राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून),यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा. राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

७. श्री. राधेश्याम मोपलवार, उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई,
८. महालेखापाल १ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई / निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०. मा. मुख्य सचिवांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई,
११. अपर मुख्य सचिव (सेवा), यांचे स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. सचिव (सा.बां.) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. सचिव (रस्ते), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. सचिव (बांधकामे), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,
१६. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई,
१७. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८. उप सचिव व कार्यासन अधिकारी (का.९/का.९ अ/का. १०), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९. सर्व कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२०. निवडनस्ती.